मेट्रो रेल्वे प्रकल्पांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरिता प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना सहाय्यक अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करून देण्यासाठी नविन लेखाशिर्ष उघडण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२१/प्र.क्र.३७/नवि-७
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना:-**

राज्यातील मुंबई, नागपूर, पुणे महानगर प्रदेशांमध्ये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो), मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (एमएमआरसीएल), पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण इत्यादी मेट्रो रेल प्रकल्प अंमलबजावणी संस्थांमार्फत मेट्रो रेल आधारित सार्वजनिक जलद वाहतूक प्रणाली विकसीत करण्यात येत आहे. सदर मेट्रो रेल प्रकल्प अंमलबजावणी संस्थांकडून मेट्रो रेल प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात येतात व त्याधारे प्रकल्पाची तांत्रिक व वित्तीय बाबी तपासून शासनाद्वारे सदर प्रकल्पांच्या अंमलबजावणीस मान्यता देण्यात येते.

केंद्र शासनाच्या केंद्रीय गृहनिर्माण व शहरी कार्य मंत्रालयाकडून "Urban Transport Planning & capacity Building Scheme" अंतर्गत नियोजित मेट्रो रेल प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी होणाऱ्या खर्चाचा ५० टक्के हिस्सा काही अटी व शर्तींवर अनुदान स्वरूपात मेट्रो रेल प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना देण्यात येतो. त्याच धर्तीवर सदर खर्चातील उर्वरित ५० टक्के हिस्सा राज्य शासनाकडून "सहाय्यक अनुदान" स्वरूपात प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला वितरीत करण्याकरिता स्वतंत्र लेखाशिर्ष असणे आवश्यक असल्याने उक्त प्रयोजनार्थ कार्यक्रम खर्चांतर्गत सहाय्यक अनुदान स्वरूपात निधी वितरीत करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यामध्ये नियोजित मेट्रो रेल प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी विविध मेट्रो रेल प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना येणाऱ्या खर्चाचा ५० टक्के हिस्सा "सहाय्यक

अनुदान" स्वरूपात अशा प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना वितरीत करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे:-

| **मागणी क्र. एफ-२ (Demand No.F-2)** | | | |
|---|---|---|---|
| २२१७ | नगर विकास विभाग | 2217 | Urban Development |
| ८० | सर्वसाधारण | 80 | Genaral |
| १९० | सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य | 190 | Assistance to Public Sector and other Undertaking |
| (०१) | मेट्रो रेल्वे प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना सहाय्य | (01) | Assistance to Metro Rail Projects Implementing Agencies |
| (०१)(०७) | मेट्रो रेल्वे प्रकल्पांचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरिता प्रकल्प अंमलबजावणी संस्थांना सहाय्यक अनुदान | (01)(07) | Grant-in-aid to Project Implementing Agencies for preparation of Detailed Project Reports of Metro Rail Projects |
| | सांकेतांक (२२१७A४७७) | | CRC (2217A477) |
| | ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर) | | 31, Grants in aid (Non Salary) |
| | कार्यक्रम /दत्तमत | | Scheme/Voted |

०२. उक्त नमूद नवीन लेखाशिर्षे २०२१-२२ या आर्थिक वर्षापासून अंमलात येतील.

०३. सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच महालेखाकार कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि./चा-१ नगर विकास विभाग/यूओआर-१४१/२०२१-२२/६३४, दिनांक १७.०२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२२२१५०१४३६९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, pseudonym=313EF6135E0B8753370AABCB2544201CB95641CD, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2022.02.22 18:39:20 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
११. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे.
१२. महानगर आयुक्त, औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, औरंगाबाद.
१३. महानगर आयुक्त, नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक.
१४. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर.
१५. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर.
१७. सर्व सह सचिव/उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प-१६/ऋण व हमी/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, नवि-४/५/३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. लेखा अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती, नवि-७.